**कर्मवीर दादासाहेब गायकवाड सबळीकरण व स्वाभिमान योजनेंतर्गत सन २०२३-२४ या वर्षात अर्थसंकल्पित करण्यात आलेला निधी खर्च करण्यासाठी मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन ज्ञापन, क्रमांक: जमीन -२०२३/प्र.क्र.५९३/अजाक**
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: ३१ मार्च, २०२४.

**ज्ञापन :**

आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना कळविण्यात येत आहे की, कर्मवीर दादासाहेब गायकवाड सबळीकरण व स्वाभिमान योजनेंतर्गत लाभार्थ्यांना जमीन उपलब्ध करुन देण्यासाठी (लेखाशीर्ष २२२५ ३६१ ८) सन २०२३-२४ या वर्षातील अर्थसंकल्पित निधीपैकी अर्थसंकल्प अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणालीवर रुपये ३९.०० कोटी निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे. याबाबतचे विवरण खालीलप्रमाणे आहे:

**(रुपये कोटीत)**

| अ. क्र. | कर्मवीर दादासाहेब गायकवाड सबळीकरण व स्वाभिमान योजनेंतर्गत लाभार्थ्यांना जमीन उपलब्ध करुन देणे | सुधारित अंदाज रुपये | खर्च करण्यासाठी मान्यता देण्यात येत असलेला निधी रुपये |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | २२२५,<br>३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर)<br>२२२५ ३६१ ८ | ५९.००<br>(अक्षरी रुपये एकोणसाठ कोटी फक्त) | ३९.००<br>(अक्षरी रुपये एकोणचाळीस कोटी फक्त) |

२. सदर निधी खर्च करण्यासाठी आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. नियंत्रण अधिकारी यांनी उपरोक्त विवरणातील रकाना ४ मधील निधी खर्च करावा. सदर खर्च करताना सर्व जिल्ह्यांना निधी उपलब्ध होईल, याची दक्षता घ्यावी. तसेच, यासंदर्भात आयुक्तस्तर अथवा जिल्हास्तर प्रतिक्षा यादी असेल, तर त्या प्राथम्यानुसार निधी वितरीत करण्यात यावा. तसेच, सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करताना लाभार्थ्याचे नाव, त्याच्या मूळ अर्जाचा दिनांक, अर्ज मंजूरीचा आदेशाचा दिनांक, लाभार्थ्यास मंजूर रक्कम व

प्रत्यक्षात अदा करण्यात आलेली रक्कम याचा तपशील उपलब्ध करुन देणे अनिवार्य राहिल. तसेच, पुढील आर्थिक वर्षात निधी मागणीचा प्रस्तावासोबत लाभार्थ्यांचे नाव, त्याच्या मूळ अर्जाचा दिनांक, अर्ज मंजूरीचा आदेशाचा दिनांक, लाभार्थ्यास मंजूर रक्कम व प्रत्यक्षात अदा करण्यात आलेली रक्कम या तपशीलासह प्रस्ताव सादर करण्यात यावा. सदर निधी खर्च झाल्यावर त्याबाबतचे विवरण व उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता शासनास सादर करण्यात यावे.

४. प्रस्तुत योजनेवर होणारा खर्च खालील लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून सन २०२३-२४ या वर्षात अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या निधीतून भागविण्यात यावा:

मागणी क्रमांक एन-३

मुख्य लेखाशीर्ष २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण

०१, अनुसूचित जातींचे कल्याण

(०३) (०५) अनुसूचित जाती व नवबौद्ध भूमिहिन शेतमजूरांना जमीनीचे वाटप (अ.जा.उ.यो.) (कार्यक्रम)

३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर)

२२२५ ३६१ ८

६. नियंत्रण अधिकारी यांनी खर्च करताना शासन परिपत्रक; वित्त विभागाच्या दिनांक १२ एप्रिल, २०२३ व ०४ मार्च, २०२४च्या शासन परिपत्रकामधील बाबींची पूर्तता करण्याची दक्षता घ्यावी. सदर योजनेचा निधी वितरीत करताना आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी उपयोगिता प्रमाणपत्रे तपासणीच्या अधिन राहून निधी वितरीत करावा.

७. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेले असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक२०२४०३३११५४९३१४६२२ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRAVIN VILAS SHISHUPAL

Digitally signed by PRAVIN VILAS SHISHUPAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=e90b11f238d671a8222f53575baf1f02e1625f1f53f35c695b531bcd5b6b83fa, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CBD05D0EA86861C0C1248FD89817636DDFBE5E50BA12759A0FE7E022D790310B, cn=PRAVIN VILAS SHISHUPAL
Date: 2024.03.31 15:59:09 +05'30'

**( प्रविण शिशुपाल )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,

२. सर्व मा. संसद सदस्य आणि विधानपरिषद/सभा सदस्य,

३. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई,
४. मा. मुख्य मंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. मा. उप मुख्य मंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई,
६. मा. मंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
७. मा. राज्य मंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
८. मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई,
९. आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई,
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर,
१२. महालेखापाल (लेखापरिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई,
१३. महालेखापाल (लेखापरिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर,
१४. संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१५. सर्व प्रादेशिक उप आयुक्त, समाज कल्याण विभाग,
१६. सर्व सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण,
१७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
१८. कोषागार अधिकारी, पुणे,
१९. वित्त विभाग (व्यय-१४ / अर्थसंकल्प-३/७, अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
२०. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प/विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई,
२१. निवड नस्ती /अजाक.